सन २०१९-२० च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी राज्य शासनाचे अशंदान (अनिवार्य) वितरीत करुन खर्चास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१९/प्र.क्र. १३५/२०१९/साशि-५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०१९.

वाचा : १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि. ०८.०७.२०१९.

२) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३१ /अर्थसंकल्पित/२०१९-२०/१०९०५, दि.०२.११.२०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सांस्कृतिक कार्य विभागांतर्गत कार्यरत राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता यांचे अंशदान आणि राज्य शासनाचे अंशदान यांच्या संयुक्त सहभागाने (५० : ५०) समान निधी योजना राबविण्यात येते. या योजनेअंतर्गत राज्यातील ग्रंथालयांना ग्रंथ, संगणक, झेरॉक्स मशीन, कपाटे, परिसंवाद व इमारत बांधकाम इ. बाबींवर खर्च करण्यासाठी निधी उपलब्ध करुन दिला जातो.

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या योजनेकरिता राज्य शासनाच्या अशंदानासाठी एकूण रुपये ३,००,०००,०० /- (अक्षरी रुपये तीन कोटी फ़क्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र. १ येथील वित्त विभागाच्या दि. ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष २०१९-२० च्या अर्थसंकल्पित तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०१९-२० च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर २०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी राज्य शासनाच्या अशंदानासाठी वित्तीय वर्ष २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या एकूण रु. ३,००,०००,०० /- (अक्षरी रुपये तीन कोटी फ़क्त) तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत निधी म्हणजेच रु. १,८०,०००,०० /- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करुन खर्चास मान्यता देण्याची करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या योजनेकरिता राज्य शासनाच्या अशंदानासाठी एकूण रुपये ३,००,०००,०० /- (अक्षरी रुपये तीन कोटी फ़क्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. वित्त विभागाच्या दि. ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार अनिवार्य निधी खर्च करण्याची मर्यादा ६०% इतकी आहे. त्याअनुषंगाने राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानच्या समान निधी योजनेसाठी राज्य शासनाच्या अशंदानासाठी रु. १,८०,०००,०० /- (अक्षरी रुपये एक कोटी ऐंशी लाख फ़क्त ) इतका निधी वितरीत करुन खर्चास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदरचा निधी खर्च करण्यासाठी ग्रंथालय

संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी कोषागारातुन निधी आहरीत करण्यापूर्वी शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.०८.०७.२०१९ अन्वये देण्यात आलेल्या सुचनांचे पालन करावे.

२. सदरचा खर्च "मागणी क्र. डब्ल्यु-४, २२०५, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०२) राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानासाठी अंशदान ( अनिवार्य ) ( २२०५ ०३०४ ) ३२ - अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच या अनुदानाच्या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधीतांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. ०८.०७.२०१९ रोजीच्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रसोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ वरील "३२-अशंदाने" यासाठी देण्यात आलेल्या तपासणी सूचीतील अटीची पूर्तता करण्यात आली आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९११०७११३८३०३२०८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Vithalrao Saware

Digitally signed by Anil Vithalrao Saware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=073348b7a8767f0f7865422df1e65ce2f3bcdf6786e4712e2c088a9ac4ffee3f, cn=Anil Vithalrao Saware
Date: 2019.11.07 11:41:56 +05'30'

( अनिल वि. सावरे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४. ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई.
५. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय,मुंबई. (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
६. सचिव (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
७. कक्ष अधिकारी, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती,साशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.